**आधार केंद्र चालकांना प्रोत्साहनपर रक्कम देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. आधार-५४२५/प्र.क्र.८७/मातं**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- २८ मार्च, २०२५

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयांतर्गत आधार केंद्र चालकांमार्फत (VLE) आधार केंद्र चालविण्यात येत आहे. या आधार केंद्रांमार्फत राज्यात सुमारे १२.८ कोटी आधार कार्ड तयार करण्यात आली आहेत. अद्यापही ०-५ वर्षे वयोगटातील ३९ टक्के बालकांची आधार नोंदणी करण्याची तसेच, ५-१७ वर्षे वयोगटातील सुमारे १.०६ कोटी व्यक्तींचे बायोमेट्रीक अद्ययावत करण्याची आवश्यकता आहे. सदर बाबींवर तातडीने लक्ष देऊन जास्तीत जास्त नोंदणी आणि अद्ययावतीकरण होण्यासाठी आधार केंद्र चालकांना प्रोत्साहनपर रक्कम देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आधार नोंदणी आणि बायोमेट्रीक अद्ययावतीकरण या सेवांचा विस्तार करुन त्यांची उपलब्धता वाढविणे, विशेषत: ग्रामीण आणि दुर्गम भागामध्ये आधार सेवा अधिक सुलभ करणे हा राज्य शासनाचा हेतू आहे. राज्यातील ०-५ वर्षे वयोगटातील बालकांची आधार नोंदणी आणि ५-१७ वर्षे वयोगटातील अनिवार्य बायोमेट्रीक अद्ययावतीकरण अधिक गतीने होण्यासाठी आधार केंद्र चालकांना प्रोत्साहन रक्कम देण्याचे शासनाने ठरविले आहे.

महाराष्ट्र राज्यात दि.०१.०४.२०२५ ते दि.३०.०६.२०२५ या कालावधीमध्ये सर्वाधिक बालकांची आधार नोंदणी (०-५ वर्षे वयोगट) आणि अनिवार्य बायोमेट्रीक अद्ययावतीकरण करणाऱ्या प्रत्येक महसूली विभागातील प्रथम तीन आधार केंद्र चालकांना अनुक्रमे रुपये १ लाख, रुपये ५० हजार व रुपये ३० हजार याप्रमाणे प्रोत्साहनपर रक्कम देण्यात यावी. त्यामुळे बालकांच्या आधार नोंदणीला मोठया प्रमाणात चालना मिळेल व वेळेवर बायोमेट्रीक अद्ययावतीकरण पूर्ण होऊन आधार आधारीत सेवा अधिक सुलभ होईल.

आधार केंद्र चालकांना प्रोत्साहनपर रक्कम देण्यासाठी येणारा खर्च राज्य सेतू सोसायटीच्या आधार योजना निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२८१६०६४५६००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDAM EKNATH ANDHALE

Digitally signed by SUDAM EKNATH ANDHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=257966df2620df1403d35023802519a4fbdcfcd894791eba41c2aef2b4c4b975, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B57FEE59F0E7101B822A49C72629C21BF9B4DC0BDE136817EE19B6B347E77F4, cn=SUDAM EKNATH ANDHALE
Date: 2025.03.28 16:07:29 +05'30'

**(सुदाम ए. आंधळे)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. सर्व अपर मुख्य सचिव/सर्व प्रधान सचिव/विशेष सचिव/सचिव,
६. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा), मुंबई,
८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
९. प्रबंधक, लोक आयुक्त/उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
११. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१३. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
१४. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य,
१५. सर्व महानगरपालिका आयुक्त
१६. पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. सर्व उप मुख्यकार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा
१८. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य,
२१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२३. निवडनस्ती/मातं